सामाजिक अत्याचारांना बळी पडलेल्या अनुसूचित जाती/जमाती इत्यादींच्या कुटुंबातील व्यक्तींची शासकीय/निमशासकीय सेवेतील वर्ग ३ व ४ च्या पदांवर प्राधान्य देऊन नियुक्ती करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक एईएम-१०८२/२२९८/सीआर-६२/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १ ऑक्टोबर १९८३.

## शासन निर्णय

सामाजिक अत्याचारांना बळी पडलेल्या अनुसूचित जाती, नवबौद्ध, अनुसूचित जमाती, विमुक्त व भटक्या जमाती यांमधील कुटुंबांचे पुनर्वसन होण्याच्या दृष्टीने व त्यांना उपजीविकेचे साधन प्राप्त व्हावे म्हणून अशा कुटुंबातील व्यक्तीस शासकीय व निमशासकीय सेवांमध्ये वर्ग ३ व ४ च्या पदांवर प्राधान्य देऊन नेमणूक देण्याचे शासनाने ठरविले आहे. यासंबंधी शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

(१) सामाजिक अत्याचारामुळे ज्या कुटुंबातील एखादी व्यक्ती मृत किंवा अपंग झाली किंवा ज्या कुटुंबातील एखाद्या महिलेवर बलात्कार करण्यात आला किंवा ज्या कुटुंबाच्या मालमत्तेचे ५० टक्के किंवा अधिक नुकसान झाले किंवा ज्या कुटुंबातील सर्व जंगम मालमत्ता नष्ट करण्यात आली अशा अनुसूचित जाती / नवबौद्ध, अनुसूचित जमाती किंवा विमुक्त व भटक्या जमाती यांच्या प्रत्येक कुटुंबातील एका व्यक्तीस विशेष प्राधान्य देऊन शासकीय कार्यालयात किंवा शासन नियंत्रित महामंडळे/उपक्रम, जिल्हा परिषदा, नगरपालिका/सहकारी संस्था यांच्या कार्यालयात वर्ग ३ किंवा वर्ग ४ किंवा तत्सम पदांवर नियुक्त करण्यात यावे.

(२) सरळ प्रवेशाने नियुक्तीसाठी अनुसूचित जाती (नवबौद्धांसह), अनुसूचित जमाती आणि विमुक्त/भटक्या जमाती यांच्याकरिता अनुक्रमे १३ टक्के, ७ टक्के व ४ टक्के पदे राखीव आहेत. त्या राखीव जागांमध्ये प्राधान्य देऊन संबंधित गटातील व्यक्तींची नियुक्ती करण्यात यावी. मात्र सदर नियुक्तीसाठी आवश्यक शैक्षणिक पात्रता, वय, इत्यादी सेवा प्रवेश नियमांतील विहित अटी त्यांनी पूर्ण केल्या पाहिजेत.

(३) युद्धग्रस्त व्यक्ती आणि आजी सैनिक किंवा मृत सैनिकांवर अवलंबून असलेली व्यक्ती यानंतरचा प्राधान्यक्रम अशा अत्याचार-पीडीत व्यक्तींना नियुक्तीसाठी द्यावा.

(४) अशा नियुक्तीसाठी या व्यक्तींची सेवायोजन कार्यालय, समाजकल्याण अधिकारी किंवा मागासवर्गीयांच्या प्रतिष्ठित संस्था यांच्यामार्फत पुरस्कृत होण्याची आवश्यकता नाही व नियुक्ती प्राधिकाऱ्यांना त्यांची नियुक्ती करता येईल. तथापि, ज्या जिल्ह्यात सदर अत्याचार घडला-तेथील जिल्हा दंडाधिकाऱ्याचे प्रमाणपत्र अशा व्यक्तीने नियुक्तीपूर्वी सादर केले पाहिजे व त्यात वरील (१) येथील संबंधित जाती/जमातीची व मृत्यू/अपंगत्व/बलात्कार/मालमत्तेचा नाश याबाबतची अट पूर्ण होत असल्याचे प्रमाणित केलेले असले पाहिजे. हे प्रमाणपत्र अशा प्रत्येक कुटुंबातील एकाच व्यक्तीस देण्यात यावे.

२. वरील आदेश महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील पदांच्या सेवा भरतीसाठी लागू आहेत.

३. मंत्रालयाच्या सर्व विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील महामंडळे/उपक्रम, जिल्हा परिषदा, नगरपालिका व सहकारी संस्था यांना वरील आदेशांचे पालन करण्यासाठी योग्य सूचना द्याव्यात व अशा

सूचनांची एक प्रत सामान्य प्रशासन विभागास (कार्यासन १८-अ) पाठवावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

दि. पु. कुलकर्णी,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (पत्राने),
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई (पत्राने),
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई (पत्राने),
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र २, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (आवश्यक प्रसिद्धी देण्यासाठी),
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व शासकीय उपक्रम व महामंडळे,
शिक्षण व सेवायोजन विभाग,
समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग,
ग्राम विकास विभाग,
नगर विकास विभाग,
कृषि व सहकार विभाग,
गृह विभाग,
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक १२, १४-अ, १८-ब, १९,
मंत्रालयाचे इतर सर्व विभाग.

---